**जिल्हा विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१, सहकारी संस्था, मुंबई व इतर १७ कार्यालयांच्या सिटी टेलिफोन एक्सचेंज, एच.सोमानी मार्ग, मुंबई जिमखान्याजवळ, मुंबई ४०० ००१ येथील जागेसाठी (२४२५०२२७) (योजनेतर) या योजनेअंतर्गत १३-कार्यालयीन खर्च रु. ६४.०० लक्ष भागविण्यासाठी पुर्नविनियोजनाने मंजुर झालेल्या तरतुदीच्या वितरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : पुनियो-२०१७/प्र.क्र.१९/२२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक:- २३ फेब्रुवारी, २०१७.

**संदर्भ:-**
१) जिल्हा विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, मुंबई यांचे पत्र क्र.जिविलेप/मुंबई/८९/२०१७, दि.१९.०१.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पुरक-२०१६/प्र.क्र.१२१/अर्थसंकल्प-३, दि.०४.०१.२०१७.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि.२०.०४.२०१६.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि.८.०२.२०१७.
५) शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, पुनर्वि-२०१७/ प्र.क्र.२०/ २०१७/ १७-स, दि.२३.०२.२०१७.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र.१ च्या प्रस्तावानुसार जिल्हा विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१, सहकारी संस्था, मुंबई व इतर १७ कार्यालयांसाठी लागणाऱ्या कार्यालयीन खर्चाकरिता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी पुर्नविनियोजनाने मागणी केल्यानुसार रु. १२७.०० लक्ष इतक्या रकमेची आवश्यकता आहे. यासाठी पुर्नविनियोजनाने मागणी केल्यानुसार शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, पुनर्वि-२०१७/प्र.क्र.२०/२०१७/१७-स, दि.२२.०२.२०१७ च्या आदेशानुसार मंजुर झालेली रु. ६४.०० लक्ष इतकी रक्कम पुर्नविनियोजनाने अदा करण्याचा प्रस्ताव विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

सदर बाब विचारात घेऊन जिल्हा विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१, सहकारी संस्था, मुंबई व इतर १७ कार्यालयांसाठी लागणाऱ्या कार्यालयीन खर्चाकरिता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी माहे मार्च, २०१७ या महिन्याकरीता रु.६४.०० लक्ष इतक्या रकमेचा खर्च भागविण्यासाठी, “महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास रासायनिक खते खरेदी करणे व त्यांचा पुरवठा करणे यासाठी येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी अर्थसहाय्य-२४२५२३७३” या योजनेतर योजनेमधुन “लेखापरीक्षेसाठी कर्मचारी वर्ग-२४२५०२२७ या अंतर्गत १३-कार्यालयीन खर्च” या उद्दीष्टाकरिता पुर्नविनियोजनाने मंजुर करण्यात आलेली रु. ६४.०० लक्ष इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्यात येत आहे. पुर्नविनियोजनाने मंजुर करण्यात आलेली रु. ६४.०० लक्ष इतकी रक्कम बीम्सद्वारे वितरित करण्यास संमती देण्यात येत आहे.

२. या रकमेचा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजुर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा:-

| | |
|---|---|
| मागणी क्र. :- | व्ही-२, |
| मुख्य/गौण/उपशिर्ष :- | २४२५, सहकार,<br>उपलेखाशिर्ष ००१ (०१) सहकार लेखापरिक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५०२२७) (योजनेतर) (दत्तमत)<br>१३-कार्यालयीन खर्च |

३. या शासन निर्णयान्वये मंजुर करण्यात आलेली रक्कम रुपये ६४.०० लक्ष (रुपये चौसष्ट लक्ष फक्त) जिल्हा विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१, सहकारी संस्था, मुंबई या कार्यालयास सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यामार्फत वितरित करण्यात यावी व यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.२०.०४.२०१६ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील लागू असलेल्या अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १०२/२०१७/व्यय-२, दि.१६.०२.२०१७ व अनौपचारिक संदर्भ क्र. १५०/अर्थ-१३/१७, दि. १९.०२.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.masharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असुन त्याचा संकेतांक २०१७०२२३१४१२३३४००२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak S Desai

Digitally signed by Deepak S Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, cn=Deepak S Desai
Date: 2017.02.23 14:13:54 +05'30'

**( दि. शि. देसाई )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. महालेखापाल-१ (लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महालेखापाल-२ (लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. जिल्हा विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. वित्त विभाग (व्यय-२) व अर्थसंकल्प शाखा, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव ( १७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवड नस्ती (२२-स).